राज्य पोलीस सेवेतील पोलीस अधीक्षक/ पोलीस उप आयुक्त (असंवर्ग) या संवर्गातील अधिका-यांच्या बदलीबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन आदेश क्र. रापोसे-१७२१/प्र.क्र.२४१/एक/पोल-१अ.
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई. पिन- ४०० ०३२.
दिनांक : १३ जानेवारी, २०२२.

संदर्भ :- शासन आदेश, गृह विभाग, क्र.रापोसे-१७२१/प्र.क्र.२०३/पोल-१अ, दिनांक ०९.०९.२०२१.

शासन आदेश :-

पोलीस आस्थापना मंडळ क्र.१ यांची शिफारस विचारात घेऊन आणि महाराष्ट्र पोलीस अधिनियम (सन १९५१ चा २२) यामधील तरतुदींनुसार, शासन आदेश, गृह विभाग, क्र.रापोसे-१७२१/प्र.क्र.२०३/पोल-१अ, दिनांक ०९.०९.२०२१, यामध्ये अंशत: बदल करण्यात येत असून, पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद राज्य पोलीस सेवेतील पोलीस अधीक्षक/ पोलीस उप आयुक्त (असंवर्ग) या संवर्गातील अधिका-यांच्या स्तंभ (३) मध्ये नमूद बदलीने पदस्थापनांऐवजी, स्तंभ (४) मध्ये निर्दिष्ट पदांवर, याद्वारे, सुधारित पदस्थापना करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. (१) | अधिका-याचे नाव (२) | शासन आदेश, गृह विभाग, दिनांक ०९.०९.२०२१, यामध्ये दर्शविलेली पदस्थापना (३) | सुधारित पदस्थापना (४) |
|---|---|---|---|
| १. | श्री. तुषार पाटील | पोलीस अधीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, गुप्तवार्ता कक्ष (तांत्रिक) | पोलीस अधीक्षक, नागरी हक्क संरक्षण, कोल्हापूर. |
| २. | श्रीम. कल्पना बारवकर | प्राचार्य, रा.रा. पोलीस बल प्रशिक्षण केंद्र, नानवीज, दौंड, जिल्हा-पुणे. | प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र, नानवीज, दौंड, जिल्हा-पुणे. |
| ३. | श्रीम. शर्मिष्ठा एस. घार्गे | पोलीस अधीक्षक, गुन्हे अन्वेषण विभाग, औरंगाबाद | उप आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, नाशिक |
| ४. | श्री. निकेश प्रकाश खाटमोडे | पोलीस अधीक्षक, फोर्स वन, यु.सी.टी.सी., मुंबई | पोलीस अधीक्षक, गुन्हे अन्वेषण विभाग, औरंगाबाद |

२. तसेच, पोलीस आस्थापना मंडळ क्र.१ यांची शिफारस विचारात घेऊन आणि महाराष्ट्र पोलीस अधिनियम यामधील तरतुदींनुसार, श्री. राजकुमार शिंदे, पोलीस अधीक्षक (मुख्यालय), दहशतवाद विरोधी पथक, मुंबई, यांची पोलीस अधीक्षक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, नांदेड, या पदावर, याद्वारे, बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

३. त्या अनुसार, पोलीस महासंचालक, म.रा., यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण/ न्यायालय यांचे आदेश, निवडणुकीची आदर्श आचारसंहिता, कायदा व सुव्यवस्था, इत्यादी लक्षात घेऊन पुढील उचित कार्यवाही करावी.

४. हा शासन आदेश, महाराष्ट्र पोलीस अधिनियम याच्या कलम २२न मध्ये निर्दिष्ट आणि शा.नि., गृह विभाग, क्र.आयपीएस-२०२१/प्र.क्र.१८६/पोल-१, दिनांक १३.०८.२०२१, यामध्ये नमूद सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०११३१९३५५९१९२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
Date: 2022.01.13 19:37:38 +05'30'

**( राहुल कुलकर्णी )**
शासनाचे सह सचिव.

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. गृह मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री, गृह (शहरे), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई.

**प्रत-**

१) पोलीस आयुक्त, बृहमुंबई.
२) महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, म.रा., मुंबई.
३) अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, म.रा., मुंबई.
४) आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, म.रा., मुंबई.
५) अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, म.रा., मुंबई.
६) अपर पोलीस महासंचालक, रा.रा. पोलीस बल, म.रा., मुंबई.
७) अपर पोलीस महासंचालक, फोर्स वन, मुंबई.
८) पोलीस अधीक्षक, सिंधुदुर्ग/ नाशिक (ग्रामीण).
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग/ कोल्हापूर/ पुणे/ नांदेड/ नाशिक/ औरंगाबाद.
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१३) संबंधित पोलीस अधिकारी *(पोलीस महासंचालक, म.रा., यांच्यामार्फत).*
१४) निवड फाईल, पोल-१अ.